अपंग व्यक्ती (समान संधी, हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम, 1995 नुसार अपंगांकरिता शासकीय सेवेत पदांचा शोध घेणेबाबत........

**महाराष्ट्र शासन,**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक-एसआरव्ही 51098/प्र.क्र.14/98/16-अ,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक 20 ऑगस्ट, 1998.

**वाचा :-** 1) शासन निर्णय, क्रमांक-एसआरव्ही-1097/प्र.क्र.12/97/16-अ, दिनांक :- 22.4.1997.
2) शासन परिपत्रक, क्रमांक-एसआरव्ही-1097/प्र.क्र.12/97/16-अ, दिनांक :- 2.5.1998.

**शासन निर्णय :-** अपंग व्यक्ती (समान संधी, हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम, 1995 चे कलम 32 नुसार शासकीय सेवेत आणि कलम 2(के) मधील "आस्थापना" या व्याख्येत नमूद करण्यात आलेल्या आस्थापनांमध्ये अपंग व्यक्तींकरिता सुयोग्य असलेल्या पदांचा शोध घ्यावयाची तरतूद करण्यात आली असून तद्नुसार शासन निर्णय क्रमांक-एसआरव्ही-1097/प्र.क्र.12/97/16-अ, दि.22.4.1997 अन्वये एका समितीची स्थापना केली होती. त्याचप्रमाणे वर नमूद केलेल्या शासन परिपत्रक दि.2.5.1998 अन्वये राज्य शासनाच्या विभागांतर्गत आणि विभागाचे अधिपत्याखाली कार्यरत असलेल्या विविध कार्यालयांमधील संवर्गाचा आढावा घेऊन अपंगांना सुयोग्य असलेली पदे शोधून काढण्याची विहित कार्यपध्दती निश्चित करण्यात आलेली आहे. या सर्व बाबींचा विचार करुन त्याचप्रमाणे उच्च न्यायालयाने महाराष्ट्र अपंग विकास मंच विरुध्द केंद्र शासन व इतर, याचिका क्रमांक-117/1998 मध्ये दि. 13 जुलै, 1998 रोजी दिलेल्या निर्देशानुसार अपंग व्यक्तींना सुयोग्य असलेल्या पदांचा शोध करण्याकरिता तज्ञ व्यक्तींची समिती नेमण्यात यावी व या समितीमध्ये 2 अशासकीय सदस्यांची (यापैकी 1 अंध व्यक्तींच्या सेवाभावी संस्थेचा प्रतिनिधी) नेमणूक करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत. तद्नुसार शासन निर्णय क्र.एसआरव्ही-1098/प्र.क्र.12/97/16-अ, दिनांक 22 एप्रिल, 1997 अधिक्रमित करुन शासन निर्णय दि. 2 मे, 1998 अन्वये विहित केलेल्या कार्य पध्दतीस पूरक मार्गदर्शन तसेच या कामाला गती देण्याच्या दृष्टीने पुढील तज्ञ व्यक्तींची समिती स्थापन करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

या समितीमध्ये खालील अधिकारी/अशासकीय सदस्य यांचा समावेश असेल.

| | | |
|---|---|---|
| 1) | सचिव, समाजकल्याण. | .. अध्यक्ष. |
| 2) | सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग. | .. सदस्य. |
| 3) | आयुक्त, अपंग कल्याण. | .. सदस्य. |
| 4) | संचालक, आरोग्य सेवा, मुंबई. | .. सदस्य. |
| 5) | डीन, ग्रांट मेडीकल कॉलेज, मुंबई. | .. सदस्य. |
| 6) | अशासकीय अंधशाळा चालविणा-या सेवाभावी संस्थांचा प्रतिनिधी. | .. सदस्य. |
| 7) | अशासकीय वैद्यकीय सेवेतील व्यक्ती. | .. सदस्य. |

अनुक्रमांक 6 आणि 7 वर उल्लेखिलेले सदस्यांचे नाव स्वतंत्रपणे सूचित करण्यात येत आहे.

वरील समितीचे "सदस्य सचिव" म्हणून सहसचिव/उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग (16-अ) हे काम पहातील. त्याचप्रमाणे आवश्यकतेनुसार सदर समिती अध्यक्ष एखाद्या व्यक्तीस/संस्थेस आणि संबंधित विभागाचे अधिका-यांना आमंत्रित करु शकतात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शि. शा. हिरीजगनेर,
शासनाचे उप सचिव.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,

सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई/खंडपीठ, औरंगाबाद, नागपूर,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधीकरण, मुंबई, औरंगाबाद, नागपूर,
* प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
अध्यक्ष, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई,
सचिव, सर्व प्रादेशिक निवड मंडळे,
सचिव, राज्य निवड मंडळ,
सर्व नगरपालिकांचे मुख्याधिकारी,
सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,
सर्व शासकीय महामंडळे, कंपन्या, स्थानिक स्वराज्य संस्था व शासन अनुदानित मंडळे/संस्था,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

------

* पत्राने.

---